# आजोबांचं स्वप्न

हॉली कैलर, मराठी: अश्विनी बर्वे





# आजोबांचं स्वप्न

हॉली कैलर, मराठी: अश्विनी बर्वे

न्यूएन थू हुआंग नॉर्टन पेयसन आणि न्यूएन शॉन टुरांग यांच्याविषयी आदर दाखवत.



# आमुख

लोकांना अजूनही आठवत असेल, व्हिएतनामच्या मीकांग नदीच्या जवळ वेळूचे बन विशाल नदीच्या तटावर सुंदरपणे पसरलेले होते. ज्यात विविध सुंदर पक्ष्यांनी, वनस्पतींनी आणि प्राण्यांनी आपलं घर केलं होतं. जगातले सगळ्यात मोठे उडणारा  पक्षी- सारस पण तिथे राही. व्हिएतनामचे निवासी त्यांना दीर्घ आयुष्याचे आणि आनंदी परिवाराचे प्रतिक मानत त्यांचं रक्षण करत.

पण व्हिएतनाम युद्धाच्या  काळात दलदलीतले पाणी वाळवण्यासाठी अनेक नाले  खोदले. त्यामुळे तिथं उगवणाऱ्या वनस्पतींचे नुकसान झाले. ज्यात सैनिक लपत होते. या नाल्यांमुळे वेळूच्या मैदानात पाण्याचा नैसर्गिक प्रवाह येणे बंद झाले. ज्यामुळे पशू-पक्ष्यांना  तिथं रहाणं अशक्य झालं. त्यातले अधिक एकतर गायब झाले किंवा मेले. युद्धानंतर अधिक जमीन तांदुळाच्या लागवडी खाली गेली.

पण काही कुटुंबांना सारस आठवतात. ते नदीतट परत पूर्वीसारखा करू इच्छितात,ज्यामुळे सारस परत येतील. पण अधिकतर नौजवानांना त्या ज़मीनीचा उपयोग भाताच्या शेतीसाठी करावा वाटत होता. जुन्या काळातल्या परंपरा आणि भविष्याच्या गरजा यांच्यात समतोल राखणे अवघड असते.





“नवीन बांध घातले आहेत,” आजोबा नामच्या ताटलीत माशाचा तुकडा घालत म्हणाले.

“ मग आता सारस परत येतील का?” नामने विचारलं.

आजोबांनी दीर्घ श्वास घेतला आणि आपल्या ताटलीत थोडा भात घेतला. “बघू या काय होतं ते. एकेकाळी एवढे सारे असत की जेव्हा ते आपल्या खाण्यासाठी- राहण्यासाठी उडत तेव्हा हिवाळ्यात आकाश पुरे झाकून जाई. युद्ध सुरु झाल तेव्हा आणि जेव्हा युद्ध संपलं तेव्हा ते गेलेले होते.

“शेवटी ते कुठे गेले?”

“त्या जागेवर जिथं त्यांना जास्त सुरक्षित वाटतं,” आजोबा म्हणाले, “आणि जिथं खाण्यासाठी भरपूर आहे.”



बेचैन होत आईने निखारे हलवले आणि माशाचा शेवटचा तुकडा पलटला. “जेवण लवकर सपव नाम,” ती म्हणाली. “खूप उशिर झाला आहे. तुझ्या आजोबांनी आपल्या पूर्ण टॉम नौंग गावाला या पक्ष्यांची फिकीर करण्यात गुंतवले आहे, जे एकदम निरुपयोगी पक्षी आहेत.”

वडिलांनी नामच्या हातावर थोपटलं. “जेव्हा पावसाळा येईल तेव्हा बांध घातलेली जमीन पाण्याने भरून जाईल,जशी पहिले भरत असे. तेव्हा तिथं परत रोपं आणि झाडं उगवतील आणि सारस सुद्धा आपल्या घरी परत येतील.

“जर ते आले नाही तर?” नामने काळजीने विचारलं.

“जर ते परत आले,” वडिलांनी आपली ताटली खाली ठेवत म्हटले , “ तर शेतकरी ती जमीन परत घेतील जी तुझ्या आजोबांनी आणि दुसऱ्या बुजुर्गांनी सारस पक्ष्यांसाठी सांभाळून ठेवली आहे. ते त्यात भात लावतील.

आजोबांनी नाखुशीने मान हलवली. “आणि आपल्या सर्वांजवळ मोठं पोट असेल.” ते नाराजीने म्हणाले आणि टेबलावरून उठले.

“झोपायची वेळ झाली आहे नाम,” आई कटुतेने म्हणाली.





नाम आजोबांच्या मागे-मागे मागच्या ओसरीत गेला. तिथं त्याने आपली चटई आजोबा जिथं बसले होते तिकडे सरकवली. त्याची दोन्ही कुत्र्याची पिल्ले चो-टॉम आणि चो-पेह्न पण त्याच्याजवळच पसरले.

“आजोबा,” नाम म्हणाला, “तुम्हांला एवढे का वाटतं की सारस पक्ष्यांनी परत यावं?”

“ कारण व्हिएतनाम त्यांचही घर होतं,” अनुभवी व्यक्तीने उत्तर दिले. “सारस ताकदवान पक्षी आहेत आणि अधिक काळ जिवंत राहतात. आम्हांला सगळ्यांना वाटते की ते आमच्यासाठी सौभाग्य आणतात. आणि आता तर लढाई संपली आहे आणि आपण सगळे धडधाकट आहोत. त्या पक्ष्यांचे धडधाकट असणे जरुरीचे आहे, नाहीतर ते कायम साठी निघून जातील.

आजोबा खूप वेळ गप्प बसले.

"आज तुम्ही गोष्ट सांगणार नाही का?" नामने शेवटी विचारलंच. आजोबा हसले. " एक छोटीशी," ते म्हणाले. "कारण खूप उशीर झाला आहे," "जुन्या काळात," आजोबांनी सुरुवात केली, " जेव्हा नदीत उदमांजर राहत असत, माझ्या वडिलांनी दोन छोट्या उदमांजरांना पकडलं. ते त्यांना माझ्यासाठी घरी घेवून आले. आम्ही त्यांना शिजवलेल्या माशांचे तुकडे खायला घालत असू. तेव्हा आम्ही त्यांना मासे पकडणे आणि ते पकडून घरी आणायला शिकवलं.

"ते आपण पकडलेले मासे स्वतःच खात नव्हते?" नामला जाणून घ्यायचं होतं.

आजोबा हसले. "कारण त्यांना आम्ही शिजवलेले मासेच खायला शिकवले होते. ते हे विसरून गेले होते की जिवंत माशांना पकडून खाता येतं."



आजोबा अजून काही आठवून हसले, “माहित आहे, जर त्यांना नदीत मासे मिळाले नाही तर ते मासे चोरून आणत. ज्या बायका नदीच्या किनाऱ्यावर बसून स्वयंपाक करत असत, तेव्हा त्यांना कळतही नसे की केव्हा त्यांचा एक मासा लंपास केला गेला आहे. नंतर त्यांना समजतच नसे की त्यांचं अन्न कमी कसं पडलं”

नामला हसता-हसता झोप आली, कारण उदमांजरांची गोष्ट त्याची आवडती गोष्ट होती.



मे महिन्याच्या मध्येच मान्सून सुरु झाला. पाऊस पहिले तर थोडा-थोडा आणि नंतर धुवाधार बरसू लागला. नदीतल्या पाण्याने उसळी घेतली आणि तिच्या किनाऱ्यावर पूर आला. पण पाऊसाचे पाणी बांधावर थांबले, मातीचा बांध वाहून गेला नाही.

नाम आपला अधिकतर वेळ आपल्या पिल्लांबरोबर घरीच घालवत असे. ते वेगाने मोठे होत होते. इकडे आजोबा रोज सकाळी बांध बघायला जात आणि परत घरी येवून मोठ्या धीराने बसून आकाशाकडे बघत बसत.

शेवटी पाऊस थांबला. आता आजोबा रोज सकाळी उठून सारसांच्या शोधात निघत. जेव्हा ते परत येई पर्यंत आई त्यांच्यासाठी गरमागरम माशाचा रस्सा तयार ठेवे.

“आज तुम्हांला कुठे सारस दिसले का?” वडील त्यांना विचारत.

आजोबा उदास होऊन नाही अशी मान हलवत. पण लगेच हे ही म्हणत, “पण बघ जरूर येतील. काल रात्री मला खरंच वाटलं की मी त्यांची हाक ऐकत आहे.”

“तुम्ही भूतकाळात जगत आहात,” आई कपाळावर आठ्या आणून म्हणे. “ते पक्षी इथून निघून गेले.”



उन्हाळा संपत आला तरी सारस पक्ष्यांचा कुठे ठाव-ठिकाण दिसत नव्हता. गावच्या पंचायतीने बैठक घेतली आणि ठरवलं की जर पुढच्या पावसाळ्यापर्यंत सारस आले नाही तर त्यांच्यासाठी आरक्षित ठेवलेल्या जमिनीवर भात लावला जाईल.

आजोबा खूप निराश झाले. “खैर,माझं हे स्वप्नं मूर्खपणाचे होते,” ते उदास होऊन म्हणाले. नाम हे ऐकून दुःखी झाला.



काही आठवड्यानंतर एक दिवस नाम म्हशींची रखवाली करत होता. त्याची कुत्री चो-टॉम आणि चो-पेह्न पण मैदानावर खेळत आले. दोघांच्या तोंडात छोटे-छोटी पिल्लं होती.

नाम  हसला. ‘‘खूप चांगली कुत्री आहात तुम्ही दोघं.’’ तो म्हणाला. कारण त्याने बघितलं होतं की कुत्र्यांनी त्या लहानग्या पिल्लांना थोडंही खरचटू दिलं नव्हतं.



जेव्हा नाम घरी गेला,आजोबा वामकुक्षी घेत होते.

“ माझी कुत्री तुमच्या उदमांजरासारखीच आहेत, आजोबा!” नामने उत्साहाने सांगितले. आजोबांनी डोळे उघडले आणि विचारलं, “ती मासे पकडतात काय?”

“नाही,” नामने हसून उत्तर दिलं. “पाखी, पाखीची पिल्लं!” तेव्हा नाम ने घाईघाईने वडिलांना सांगितले, “त्यांचा  सुरमई रंग आहे, अगदी वेगळा.मी अशी पिल्लं आधी कधीच बघितली नाहीत.”

वडिलांनी  विचार करत आपल्या पोटावरून हात फिरवला. नंतर ओठांवर बोट ठेवत त्यांनी खुणावलं, म्हणजे नाम पुढे काही बोलणार नाही.



दुसऱ्या दिवशी सकाळी नाम आणि त्याचे बाबा अल्ल सकाळी गुपचूप घरातून निघाले. गावात अंधार होता आणि शांतता सुद्धा. ते त्या जागेवर गेले जिथं आधी सारस पक्षी खात-बसत असत, सूर्य अजून उगवायचा होता. थोड्याच वेळात जेव्हा नामचे डोळे त्या हलक्या प्रकाशाला सरावली, त्याला दूर सारस पक्षी दिसू लागले.

“ मी जवळजवळ दोनशे तरी मोजले आहेत.” वडील म्हणाले.

“ आता मी आजोबांना सांगू शकतो काय?” नामने विंनती केली. वडिलांनी हो म्हणत मान हलवली आणि नाम गावाच्या दिशेने धावला.



नामचे पाय  वेगाने पडले. सूर्य चमकू लागला होता. नामला माहित होते की लवकरच सारस आकाशात  असतील.

“लवकर चला आजोबा,” तो रस्त्यावर धावत ओरडला. नाम आजोबांचा हात ओढत त्यांना पूल पार करत बांधाकडे ओढू लागला.





काहीच मिनिटात टॉम-नौंग गावाच्या वर एवढे सारस होते की त्यांना कोणी मोजू शकत नव्हते. हवेत त्यांचे दमदार आवाज घुमू लागले. पूर्णची पूर्ण गाव त्यांना बघायला निघालं.

आजोबांचा  त्यांच्या डोळ्यावर विश्वास बसत नव्हता. “किती सुंदर आहेत ना ते!” ते आनंदाने ओरडले.

आणि सगळ्यांनी मानलं- आईने सुद्धा.



त्या रात्री जेव्हा नाम झोपण्याची तयारी करत होता, आजोबा त्याच्याजवळ येऊन बसले.

“ तुमचं स्वप्नं चांगलच होतं,” नाम हळू आवाजात म्हणाला. “तुम्हांला वाटतं का की सारस  आता इथंच राहतील?” नामला माहित करून घ्यायचं होतं.

“ हे तर तुझ्यावर अवलंबून आहे,” आजोबा म्हणाले.

आणि नामला त्यांचं म्हणणं समजलं.